**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांच्या मानधनात दिनांक १.०४.२००८ पासून केलेल्या वाढीची थकबाकी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक-एबावि-२००८/प्र.क्र.२०४/का-६
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक :- १५ ऑक्टोंबर, २००९

**वाचा :-** १. केंद्र शासन, महिला व बाल विकास विभाग, क्र.१-५/२००८-सी.डी.१, दि. २४ ऑक्टोंबर, २००८ चे पत्र
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र. एबावि-२००८/प्र.क्र.२०४/का.६, दि. १ जुलै, २००९
३. केंद्र शासन, महिला व बाल विकास विभाग, एफ.क्र.४-२ (१३)/२००६-सीडी-II, दि.२७.८.२००९ चे पत्र

**प्रस्तावना :-** वाचा क्र.२ येथील शासन निर्णयानुसार अंगणवाडी कर्मचा-यांना राज्य शासनामार्फत देण्यात येणा-या मानधनात कपात न करता केंद्र शासनाने या कर्मचा-यांना दिनांक १ एप्रिल, २००८ पासून केलेली मानधन वाढ देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या निर्णयानुसार सन २००८ - ०९ या मागील समाप्त आर्थिक वर्षाची थकबाकी देण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाने एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविकांच्या मानधनात दिनांक १ एप्रिल, २००८ पासून दरमहा अनुक्रमे रु. ५००/-, रु. २५०/- व रु. २५०/- एवढी वाढ केलेली आहे. त्यासाठी केंद्र शासनाने सन २००८-०९ या आर्थिक वर्षातील मानधन वाढीच्या थकबाकी पोटी रु.६६,५२,४४,०००/- इतका निधी दोन हप्त्यात मंजूर केलेला होता. परंतु, हा निधी सन २००८-०९ या आर्थिक वर्षात खर्च होऊ शकला नव्हता. आता केंद्र शासनाने रु.६६,५२,४४,०००/- (अक्षरी रुपये सहासष्ट कोटी बावन्न लाख चव्वेचाळीस हजार फक्त) इतका निधी सदंर्भाधिन क्र.३ येथील पत्रान्वये चालू आर्थिक वर्षात सन २००९-१० मध्ये खर्च करण्यास परवानगी दिली आहे. त्यामुळे केंद्र शासनाने दिनांक १ एप्रिल, २००८ पासून केलेल्या मानधन वाढीची सन २००८-०९ या आर्थिक वर्षातील सहा महिन्याची थकबाकी देण्याकरिता रु.३४,००,००,०००/- (अक्षरी रुपये चौतीस कोटी फक्त) इतकी तरतूद केंद्र शासनाच्या मानधनाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीतून खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक एक्स-१-२२३६, पोषण आहार, ०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण १०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम, केंद्रपुरस्कृत योजना (०१) (०३) एकात्मिकृत बाल विकास सेवा योजना (२२३६ ०५१९) ०२ मजूरी, व केंद्र पुरस्कृत योजना-ग्रामीण (०४)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान आस्थापना अनुदाने (२२३६ ००७२) (स्थानिक क्षेत्र) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६४५/०९/व्यय-६, दिनांक ८.१०.२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

(ज. कि. मगरे)
सह सचिव

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,रायगड भवन,नवी मुंबई,
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
महासंचालक, महिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण),
सहायक संचालक, (वित्त व लेखा) एबाविसेयो, कोकण भवन, नवी मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग/व्यय-६ मंत्रालय, मुंबई
महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
अवर सचिव / कार्या-४ (अर्थसंकल्प) महिला व बाल विकास विभाग
निवड नस्ती (कार्यासन ६)